मुंबई पोलीस नियमावलीच्या नियम ३०० अन्वये पोलीस निधीतून द्यावयाच्या बक्षीसांकरीता मार्गदर्शक सूचना आणि आर्थिक मर्यादेमध्ये सुधारणा करण्याबाबत....

महाराष्ट्र शासन
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एडब्ल्यूडी-०११५/प्र.क्र.२६८/पोल-१**
गृह विभाग, दुसरा मजला,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : २९ नोव्हेंबर, २०१८

वाचा :-१) शासन निर्णय, गृह विभाग क्र. जीओआर- ०६९४/सीआर-२४/ पोल-१०, दि. २५.०६ १९९६.
२) शासन निर्णय, गृह विभाग क्र. जीओआर- ०६९४/सीआर-२४/ पोल-१०, दि. ३० ऑगस्ट,१९९६
३) शासन निर्णय, गृह विभाग क्र. जीओआर- ०६९४/सीआर-२४/ पोल-१०, दि. १३ डिसेंबर,१९९९
४) शासन निर्णय, गृह विभाग क्र. जीओआर- ०६९४/सीआर-२४/ पोल-१०, दि. २७ सप्टेंबर,२०००
५) शासन निर्णय, गृह विभाग क्र. जीओआर- १३०५/प्र.क्र.५०९/ पोल-१, दि. ०७ मे, २००८

शासन निर्णय:-

मुंबई पोलीस नियमावलीच्या नियम, ३०० नुसार पोलीस निधीतून पोलीस अधिकारी, खाजगी व्यक्तींना दयावयाच्या बक्षिसाबाबतची मार्गदर्शक तत्वे संदर्भाधीन शासन निर्णय क्र.१ ते ५ अन्वये विहित केली आहेत. या मार्गदर्शक तत्वात सुधारणा करण्याचा आणि बक्षिसाची रक्कम प्रदान करण्याकरीता विहित केलेल्या आर्थिक मर्यादा व अधिकारांची व्याप्ती वाढविण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. त्यानुसार या संदर्भात यापुर्वी अस्तित्वात असलेले सर्व शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत असून, पोलीस निधीतून पोलीस अधिकारी/ कर्मचारी यांना बक्षीस देण्यासाठी मार्गदर्शक सूचना या शासन निर्णयासोबत जोडलेल्या **“परिशिष्ट-अ”** प्रमाणे विहीत करण्यात येत आहेत. बक्षिसाची रक्कम प्रदान करण्यासाठी आर्थिक मर्यादा **“परिशिष्ट-ब”** प्रमाणे विहित करण्यात येत आहेत. शासन निर्णयातील तरतूदी ह्या शासन निर्णय निर्गमीत केल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक:२७०/१८/व्यय-७, दिनांक २५.०९.२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२९१३०००७४६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kailas A. Gaikwad

Digitally signed by Kailas A. Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, cn=Kailas A. Gaikwad
Date: 2018.11.29 13:04:48 +05'30'

**( कैलास गायकवाड )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव (*पत्राने)
२. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (अ.व सु.), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
९. महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१०.महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई
११.पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई
१२.अपर पोलीस महासंचालक, (का. व सू.), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३.अपर पोलीस महासंचालक,गुन्हा अन्वेषण विभाग (गुन्हे), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४.अपर पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१५.अपर पोलीस महासंचालक, नक्षल विरोधी अभियान, नागपूर.
१६.अपर पोलीस महासंचालक, लोहमार्ग/वाहतूक/प्रशिक्षण/ रा.रा.पो.बल, म.रा., मुंबई.
१७.आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१८. सर्व पोलीस आयुक्त ( अपर पोलीस महासंचालक दर्जाचे)
१९.अपर पोलीस महासंचालक, नागरी हक्क संरक्षण, म.रा., मुंबई.
२०.अपर पोलीस महासंचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक.
२१.अपर पोलीस महासंचालक व संचालक, बिनतारी संदेश, म.रा.,पुणे.
२२.सर्व सह पोलीस आयुक्त (विशेष पोलीस महानिरीक्षक दर्जाचे)
२३.विशेष पोलीस महानिरीक्षक, मोटार परिवहन, म.रा., पुणे.
२४.सर्व परिक्षेत्रीय विशेष पोलीस महानिरीक्षक

२५.इतर सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक
२६.सर्व पोलीस आयुक्त ( पोलीस उप महानिरीक्षक दर्जाचे)
२७.सर्व अपर पोलीस आयुक्त (पोलीस उप महानिरीक्षक दर्जाचे पद)
२८. इतर सर्व पोलीस उप महानिरीक्षक
२९.सर्व पोलीस उप आयुक्त (पोलीस अधीक्षक दर्जाचे)
३०.सर्व पोलीस अधीक्षक
३१.सर्व समादेशक, राज्य राखीव पोलीस बल
३२.सर्व प्राचार्य, पोलीस प्रशिक्षण विद्यालय व अपारंपारिक अभियान प्रशिक्षण केंद्र
३३.उप संचालक, गुन्हे प्रकटीकरण शाखा, नाशिक
३४.सह संचालक, भापोसे कक्ष, गृह विभाग, मंत्रालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३५.सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, गृह विभाग, मंत्रालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३६.निवडनस्ती, कार्यासन-पोल-१, गृह विभाग, मंत्रालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई

**शासन निर्णय क्रमांक : एडब्ल्यूडी-०११५/प्र.क्र.२६८/पोल-१, दिनांक:२९ नोव्हेंबर,२०१८ सोबतचे**

**परिशिष्ट-अ**

**मुंबई पोलीस नियमावलीच्या नियम ३०० नुसार पोलीस निधीतून पोलीस अधिकारी/कर्मचरी यांना दयावयाच्या बक्षिसाबाबतची मार्गदर्शक सूचना.**

१. सदर बक्षिसे ही नियमावलीत विहित केल्याप्रमाणे केवळ पोलीस निरीक्षक आणि त्याखालील दर्जाच्या अधिकाऱ्यांनाच देण्यात यावीत.

२. नियमावलीत स्पष्ट तरतुद असल्यामुळे इतर वरिष्ठ पोलीस अधिकाऱ्यांस बक्षिसास पात्र ठरविण्यात येवू नये. वरिष्ठ पोलीस अधिकाऱ्यांचा इतर प्रोत्साहनपर बाबीसाठी विचार करावा.

३. बक्षिसासाठी केवळ खाली उल्लेखिलेल्या घटना पात्र ठरविण्यात याव्यात.

अ) धैर्य, कौशल्य, किंवा धडाडी आवश्यक असेल अशा घटनांचा तपास करणे. यामध्ये तुरुंगातुन पळालेल्या विशेषत: जन्मठेपेची शिक्षा झालेल्या कैद्याला पुन्हा पकडणे, फरार (WANTED) गुन्हेगारांना कैद करणे, गुन्हयाच्या शोधार्थ हवी असलेली माहिती प्राप्त करणे किंवा अपवादात्मक असे उत्कृष्ट तपासणी कार्य करणे, अशा घटनांचा अंतर्भाव असेल.

ब) तत्परता, प्रामाणिकपणा आणि बुध्दीकौशल्य वापरुन तपासणी कार्यात महत्वाची मदत करणे.

क) एखाद्या मोठया प्रकरणात लेखनिक/ पोलीस हवालदार किंवा पोलीस शिपाई यांनी मोठया कामाचा बोजा पार पाडणे.

ड) अपवादात्मक प्रकारात चलाखी, तत्परता दर्शविणारे, हुशारीने पार पाडलेले/ जनतेच्या स्तुतीस पात्र असणारे काम इत्यादी,

इ) बक्षिसे देणाऱ्या अधिकाऱ्याच्या मते पोलीस दलाची कार्यक्षमता वाढविण्याच्या दृष्टीने उत्कृष्ट कार्य करणे, पोलीस बंदोबस्त, परेड इत्यादी.

ई) गुन्ह्याचे यशस्वी शोधकार्य किंवा गुन्हेगारांच्या बाबत संशय व्यक्त करुन कारवाई करण्यासंदर्भात बक्षिसे ही केवळ -

(१) गुन्हेगारावरील गुन्हा शाबीत झाल्यावर, वरिष्ठ कोर्टात अपिलात पुनर्निरिक्षणात किंवा इतर प्रकारे प्रकरणाची दखल घेतल्यानंतर किंवा वरिष्ठ न्यायालयात अपिल पुनर्निरिक्षण इत्यादींचा निकाल लागल्यानंतर देण्यात यावी.

(२) गुन्हा शाबीत होण्यापूर्वी पोलीस अधिकाऱ्यांना बक्षिसे देण्याची आवश्यकता वाटत असल्यास अशा प्रकरणी पोलीस महासंचालकांच्या पूर्वमंजूरी घेण्यात यावी.

(३) पोलीस हवालदार आणि पोलीस शिपाई यांच्या संदर्भात मुंबई पोलीस नियमावलीतील नियम ३०० (८) मधील तरतुद लागु राहिल.

फ) ज्या घटनेमध्ये कुप्रसिध्द गुन्हेगारांविरुध्द, अतिरेक्याविरुध्द, नक्षलवादयांविरुध्द कारवाई करण्यात आली असेल किंवा ज्या घटनेमध्ये शासकीय अथवा सार्वजनिक मालमत्तेचे रक्षण करण्याचा प्रश्न निर्माण झाला असेल, अशा घटना.

४. गुन्हयाच्या शोध कार्यात किंवा प्रतिबंधात्मक कार्यात उल्लेखनिय मदत करणाऱ्या खाजगी व्यक्तींनाही बक्षिस देण्यासाठी पात्र ठरविण्यात यावे.

५. पोलीस अधिकाऱ्यांना विहित केलेल्या आर्थिक मर्यादेतच त्यांनी बक्षिसे देण्याच्या प्रस्तावाचा विचार करावा. ज्या प्रकरणात पोलीस अधिकाऱ्यांना त्यांच्या विहित मर्यादेपेक्षा अधिक रक्कम मंजूर करण्याची आश्यकता वाटत असेल अशी प्रकरणे सविस्तर कारणमिमांसेसह प्रकरणपरत्वे पोलीस महासंचालकांकडे किंवा शासनाकडे पाठवावित.

६. पोलीस कर्मचाऱ्यांचे शौर्य आणि धैयै आणि त्यांची गुणवत्ता यांची तुलना बक्षिसाच्या रक्कमेशी करण्यात येवू नये. बक्षिसाची रक्कम गुणवत्तेचे प्रतिक समजण्यात यावे.

७. कोणत्याही कर्मचाऱ्याला त्याच्या एक महिन्याच्या एकत्रित वेतनापेक्षा जास्त रक्कम बक्षिस म्हणून देण्यात येऊ नये.

८. राज्यातील पोलीस अधिकाऱ्यांनी इतर राज्यातील एखादया गुन्हयांचा तपास उत्कृष्ट पध्दतीने केला असेल, अशा गुन्हयातील गुन्हेगारांना शोधून काढण्यात/ पकडण्यात त्यांचे कौशल्य दिसून आले असेल, तर इतर राज्यांकडून पारितोषिक घेता येईल. ( उदा. इतर राज्यात नक्षलवादी किंवा अतिरेक्यांनी केलेल्या एखाद्या गुन्हयापोटी महाराष्ट्र राज्यात होणाऱ्या तपासात मदत केली असेल व अशा गुन्हेगाराला/ अतिरेक्यांना राज्यात शोधून काढले असेल.)

९. महाराष्ट्रात घडलेल्या एखादया गुन्हाची पाळेमुळे इतर राज्यातसुध्दा पसरलेली असतील व इतर राज्यांना त्याचा प्रादुर्भाव जाणवल्याने त्या राज्यात जाऊन महाराष्ट्रातील पोलीसांनी उत्कृष्ट तपास केला असेल किंवा गुन्हेगार हुडकून काढले असल्यास, अशा ज्या इतर राज्यात गुन्हेगारीला प्रतिबंध झाला असेल, तर त्या राज्याने महाराष्ट्र पोलीसांना बक्षिस जाहिर केल्यास ते पारितोषिक स्विकारता येईल.

मात्र अ.क्र. ८ व ९ येथील प्रकरणी संबंधित पोलीस अधिकाऱ्याने अशा प्रकारे इतर राज्याकडून मिळणारे पारितोषिक स्विकारण्यापूर्वी राज्य शासनाची पूर्वपरवानगी घेणे आवश्यक राहिल.

*****

**शासन निर्णय क्रमांक : एडब्ल्यूडी-०११५/प्र.क्र.२६८/पोल-१, दिनांक:२९ नोव्हेंबर,२०१८ सोबतचे**

**"परिशिष्ट - ब"**

**बक्षिसे प्रदान करण्यासाठी आर्थिक मर्यादेमध्ये सुधारणा.**

| अ. क्र. | बक्षिस मंजूर करण्याचे अधिकार प्रदान करावयाच्या अधिकाऱ्यांचे पदनाम | आर्थिक मर्यादा (रुपये) |
|---|---|---|
| १ | २ | ४ |
| १ | अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई. | रु.३,००,०००/- |
| २ | पोलीस महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, म.रा., मुंबई. | रु.२,००,०००/- |
| ३ | महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग,म.रा., मुंबई. | रु. २,००,०००/- |
| ४ | पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई. | रु.१,००,०००/- |
| ५ | अपर पोलीस महासंचालक (कायदा व सुव्यवस्था ) म.रा., मुंबई. | रु.१,००,०००/- |
| ६ | अपर पोलीस महासंचालक ( विशेष कृती ) मुंबई . | रु.१,००,०००/- |
| ७ | अपर पोलीस महासंचालक ( दहशतवाद विरोधी पथक ) मुंबई | रु.१,००,०००/- |
| ८ | अपर पोलीस महासंचालक, लोहमार्ग/ वाहतुक/ प्रशिक्षण/ नागरी हक्क संरक्षण/महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक/ राज्य राखीव पोलीस बल, मुंबई/ बिनतारी संदेश विभाग, म.रा., पुणे/ गुन्हे अन्वेषण विभाग, पुणे. | रु.१,००,०००/- (प्रत्येकी) |
| ९ | आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग,म.रा., मुंबई. | रु.१,००,०००/- |
| १० | सर्व पोलीस आयुक्त | रु.१,००,०००/- |
| ११ | सर्व पोलीस आयुक्त ( विशेष पोलीस महानिरीक्षक दर्जाचे ) | रु.७०,०००/- |
| १२ | सर्व सह पोलीस आयुक्त ( विशेष पोलीस महानिरीक्षक दर्जाचे ) | रु.७०,०००/- |
| १३ | सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक (परिक्षेत्रीय) | रु.७०,०००/- |
| १४ | विशेष पोलीस महानिरीक्षक, नक्षलवाद विरोधी अभियान, नागपूर. | रु.७०,०००/- |
| १५ | विशेष पोलीस महानिरीक्षक,फोर्स वन, म.रा.मुंबई | रु.७०,०००/- |
| १६ | सर्व अपर पोलीस आयुक्त/पोलीस आयुक्त ( पोलीस उप महानिरीक्षक दर्जाचे पद ) | रु.५०,०००/- |
| १७ | सर्व पोलीस उप आयुक्त ( पोलीस अधीक्षक दर्जाचे ) | रु.३५,०००/- |
| १८ | सर्व पोलीस अधीक्षक | रु.३५,०००/- |
| १९ | सर्व समादेशक, राज्य राखीव पोलीस बल | रु.३५,०००/- |
| २० | सर्व प्राचार्य, पोलीस प्रशिक्षण विद्यालय व अपारंपारीक अभियान प्रशिक्षण केंद्र | रु.२५,०००/- |

*********